**अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळ आयोजित अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाच्या आयोजनासाठी अर्थसहाय्य मंजूर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**मराठी भाषा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : मभादि-२०२२/प्र.क्र.१०/भाषा-३**
नवीन प्रशासकीय भवन, ८ वा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दि. ०७/०३/२०२२

**वाचा :-** १) मराठी भाषा विभाग, शासन निर्णय क्र.सासंअ-२०१५/प्र.क्र.१०३/भाषा-३, दि.०९.१०.२०१५
२) मराठी भाषा विभाग, शासन निर्णय क्र.सासंअ-२०१८/प्र.क्र.१२२/भाषा-३, दि.२३.०८.२०१८
३) मराठी भाषा विभाग, अर्थसंकल्प,ज्ञापन क्र. अर्थस-२०२२/प्र.क्र.२०/अर्थसंकल्प,दि.०७.०३.२०२२

**पार्श्वभूमी :-**

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाच्या मागणी क्रमांक झेडएफ-०२, मुख्य लेखाशीर्ष २२०५, कला व संस्कृती, १०२ कला व संस्कृती प्रचालन, ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर), (०१) (१०) अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनास अनुदान (कार्यक्रम) (२२०५ ३४४८) या उद्दीष्टांतर्गत अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाच्या आयोजनात शासनाचा सहभाग म्हणून दरवर्षी एकरकमी कायमस्वरुपी रु.५० लक्ष इतके अर्थसहाय्य अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळाच्या खात्यात दसऱ्यापूर्वी जमा करण्याचा निर्णय शासनाने दि.२३.०८.२०१८ रोजी घेतलेला आहे.

२. उपरोक्तनुसार सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरिता रु.५० लाख इतके अनुदान नाशिक येथे पार पाडलेल्या ९४ व्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाकरिता एकरकमी उपलब्ध करुन देण्यात आले आहे. आता ९५ वे अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलन महाराष्ट्र-तेलंगणा या त्रैभाषिक सीमाभागाच्या उदगीर जि.लातूर येथे दि.२२,२३ व २४ एप्रिल येथे होणार आहे. त्याकरिता रु.५० लाख निधीची मागणी करण्यात आली आहे.

**शासन निर्णय :**

संगणक संकेतांक (२२०५ ३२०५) अंतर्गत सदर योजनेतील रु.५० लाख इतका निधी संगणक संकेतांक (२२०५ ३४४८) खाली पुनर्विनियोजनाने उपलब्ध करुन देण्याचा प्रस्ताव वित्त विभागास सादर करण्यात आला असता, सदर प्रस्तावास वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने सन २०२१-२२ या चालू वित्तीय वर्षाकरीता महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ यांच्या योजनांसाठी मागणी क्रमांक झेडएफ-०२, मुख्य लेखाशिर्ष २२०५-कला व संस्कृती १०२ कला व संस्कृती प्रचालन, ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) (०१) (१०) अखिल भारतीय साहित्य संमेलनास अनुदान (कार्यक्रम) (२२०५ ३४४८) या उद्दिष्टा अंतर्गत महाराष्ट्र-तेलंगणा या त्रैभाषिक

सीमाभागाच्या उदगीर, जिल्हा लातूर येथे दि.२२, २३, २४ एप्रिल, २०२२ रोजी होणाऱ्या ९५ व्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाकरिता वेळोवेळी विहित करण्यात आलेल्या अटी व शर्तींच्या अधीन राहून रु.५० लक्ष इतका निधी उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. यावरील खर्च करण्यासाठी सहायक लेखा अधिकारी, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी आणि सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई यांनी वितरीत अनुदानाच्या खर्चाचा तपशील व उद्दीष्टनिहाय उपयोगिता प्रमाणपत्र विहित विवरणपत्रात शासनास सादर करावे.

४. सदर ज्ञापन वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १२५/२०२२/व्यय-४, दि.०४.०३.२०२२ तथा, अर्थसंकल्प, मराठी भाषा विभाग ज्ञापन क्र. अर्थसंकल्प, ज्ञापन क्र. अर्थस-२०२२/ प्र.क्र.२०/ अर्थसंकल्प, दि. ०७.०३.२०२२ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३०७१७०४१२०२३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MILIND BHAGWAN GAWADE

Digitally signed by MILIND BHAGWAN GAWADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MARATHI LANGUAGE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d043e1f55c6ded344ffebea8801d8c286bfdcafaea54c716c9b31b47b87a9476, pseudonym=3FD721BE2B19DF245E0157FD3DC7B26475009465, serialNumber=EF777B84EAC7F675E3493144EF06F0FA1CB47DE2A32BE1156CA04D038F42D6E1, cn=MILIND BHAGWAN GAWADE
Date: 2022.03.07 18:24:40 +05'30'

**( मिलिंद गवादे )**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा.सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव/स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
४. मा.सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
५. मा.विरोधी पक्षनेता, विधान सभा/विधान परिषद, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, मुंबई,
६. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
७. सर्व मंत्रालयीन विभागांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
८. प्रबंधक, लोक आयुक्त आणि उप लोक आयुक्त कार्यालय, मुंबई,
९. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई, नागपूर,
१०. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता),मुंबई, नागपूर,
११. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
१२. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,

१३. सर्व मंत्रालयीन विभाग,
१४. सर्व विभागीय आयुक्त,
१५. सर्व जिल्हाधिकारी,
१६. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
१७. भाषा संचालक, भाषा संचालनालय, बांद्रा, मुंबई,
१८. अध्यक्ष / सचिव महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई,
१९. अध्यक्ष / सचिव, महाराष्ट्र राज्य विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई,
२०. संचालक / प्रशासकीय अधिकारी, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई,
२१. मराठी भाषा विभाग / सर्व कार्यासने,
२२. निवड नस्ती (भाषा-३).